कोयना अवजलाचा वापर करण्यासंदर्भात सखोल अभ्यास करण्यासाठी नियुक्त केलेल्या स्वतंत्र अभ्यास गटाने तयार केलेला अहवाल इंग्रजीतून सादर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-विसस-२००५/(९७/०५)/जसंनि**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक- १४ फेब्रुवारी, २००७.**

**संदर्भ:-** शासन निर्णय क्र. विसस २००५/(९७/०५)/जसंनि, दि. २० नोव्हेंबर,२००६.

**प्रस्तावना :-**

कोयनेच्या विद्युत निर्मितीनंतर वाशिष्टी नदीत सोडण्यात येणारा अवजलाचा वापर करुन अथवा अन्य पर्यायी स्त्रोतातून रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील पाणी टंचाई दूर करण्याच्या संदर्भातील अभ्यास करुन त्याबाबत शासनास अहवाल सादर करण्यासाठी श्री. म.दि.पेंडसे, निवृत्त सचिव, जलसंपदा विभाग यांचे अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या स्वतंत्र अभ्यास गटास दि. ३१ ऑगस्ट, २००६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर अभ्यास गटाचा अंतिम अहवाल दि.२७.०९.२००६ रोजी मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे वगळून) यांना सादर करण्यात आला आहे. अभ्यास गटाने तयार केलेला अहवाल संपूर्ण मराठीत आहे. सदर अहवाल कृष्णा पाणी तंटा लवादासमोर सादर करावयाचा असल्याने त्याचे इंग्रजीत भाषांतर करुन इंग्रजी अहवाल तयार करण्यासाठी अभ्यास गटास दि. १६.०१.२००७ पर्यंत मुदत दिली होती. सदर मुदत संपुष्टात आली असल्याने व सदर मुदतीत काम पूर्ण न झाल्याने अभ्यास गटास इंग्रजी अहवाल सादर करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोयनेच्या विद्युत निर्मितीनंतर वाशिष्टी नदीत सोडण्यात येणारा अवजलाचा वापर करुन अथवा अन्य स्त्रोतातून रत्नागिरी व सिंधुदूर्ग जिल्हयातील पाणी टंचाई दूर करण्याच्या संदर्भातील अभ्यास करुन त्याबाबत शासनास सादर केलेल्या मराठी अहवालाचे इंग्रजीत भाषांतर करुन इंग्रजी अहवाल तयार करण्यासाठी श्री. म.दि.पेंडसे, निवृत्त सचिव, जलसंपदा विभाग, यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या स्वतंत्र गटास दि. ३०.०४.२००७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. लवादासमोर महाराष्ट्राची बाजू मांडण्यासाठी मूळ अहवालातील शिफारशींची तातडीने आवश्यकता असल्यामुळे प्रथमतः शिफारशींचे इंग्रजी भाषांतर शासनास सादर करावे व तद्नंतर उर्वरित इंग्रजी अहवाल यथाशीघ्र सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

सांकेतांक क्र. 201412151510 548427

( अ.कि.सुरुशे )
शासनाचे उप सचिव



कृ.मा.प---२

प्रत:-

मा. मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, मा. मंत्री जलसंपदा (कृष्णा खोरे वगळून) व लाक्षेवि, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, मा. राज्यमंत्री जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता, (जसं) व सह सचिव जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता, (कृपातंल) व सह सचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहाय्यक, उपसचिव (जसं), जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
श्री. म.दि.पेंडसे निवृत्त सचिव, जलसंपदा विभाग, ६ मधुमालती, तिसरा मजला, स्वस्तीश्री सोसायटी, गणेशनगर, पुणे- ४११ ०२९.
मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, जलसंपदा विभाग, मुंबई.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग.
उप संचालक, भुजल सर्वेक्षण, कोकण प्रदेश, सिडको भवन, नवी मुंबई.
श्री. श्रीरंग कद्रेकर, माजी कुलगुरु, डॉ. बा.सा.कोकण कृषि विद्यापीठ, दापोली निलश्री, थिबा पॅलेस रोड, रत्नागिरी ४१५६१२.
अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव, रत्नागिरी.
जसंनि कार्यासन (संग्रहार्थ).